# कांचन बारीतील संघर्षानंतर ...

भाग ८ व ९ E Book 132

## कांचन बारीतील संघर्षानंतर



## कुंजरगडापर्यंत व नंतर कारंजा पेठेवर हल्ला

दि १७ ऑक्टोबर १६७० रोजी शिवाजी महाराज कांचनबारीत इखलास खानाच्या तोफखान्याला नादुरुस्त करून दाऊद कानाला वर्तुळाकार वेढा घालून रसद वाहतूक सोडली. आता त्याला तोफा आणि धनुष्याबाण-भाले असे लांब पल्ल्यावरून

फेकून आपल्या सैनिकांला भेदरवून, जखमी करून पळायला लावायला वेळ लागेत असा अंदाज बांधून महाराजांनी मैदानी प्रदेशातील धोडप किल्ला ओलांडून डोंगररांगांना उजवे ठेवले. तो वर कळवण पासून मारकंडा घाटातून चढून वणी गावापाशी उतारावरून येताना मालवाहकांचा तांडा येत होता. त्यानंतर कळवण ते वणी आणि नंतर दिंडोरी करत पिंपळगाव (बसवंत) या वाटेतील मार्गात तीन हल्ले परतवले गेले...

दाऊद खान तरातरा महाराजांच्याया मागे आला. वणीच्या उतारावर तांड्याला अडवणे शक्य झाले नसेल कारण तो आधीच पुढे गेला असावा. आणि काही रेंगाळलेली जनावरे आणि त्यांच्या मागे संरक्षक सैनिक यांच्याशी भिडण्यात काही अर्थ नाही असे दिसताच दाऊद खानाने आपल्या सैनिकांना मागे परतून कडवा नदीच्या काठावर तांडा चारापाणी आणि विश्रांती करत असेल तिथे धरून आपल्या कब्जात घेणे शक्य होईल असा विचार करून तांड्याला कळू न देता लपत छपत पुढे सरकत राहिला असावा.

# शिवाजी महाराजांचे लष्करी डावपेच

## वणी बाबापूर जवळ दाऊदचे सरदार भिडले चकमक १




तांडा मारकंडा घाट ओलांडून बाबापुरच्या उतारावर

कनाशी

कळवण

कळवण ते वणी रस्त्यावरील लमाणांचे तांडे

अभोना

वणी रस्त्यावर महाराज मिळाले

कांचनबारीतून पुढे सटकलेले महाराज आणि त्यांचे घोडदळ वणीनंतर उतारावर तांड्यात सामिल झाले.

Vani
वणी

दाऊदखान आपले सैनिक तुकड्यात जमवून मागोमाग चालून आला ...

कडवा नदीपाशी दाऊद खानाशी चकमक

दुसरी तुकडी दिडोरी पाशी जमवून मागोमाग चालून आली ...

पालखेड पाशी ३

दिंडोरी

Pimpalgaon
Baswant
पिंपळगांव
बसवंत

मोहाडी

आणखी एक सैन्य तुकडी पालखेडपाशी भिडली. तीनही ठिकाणी मार खाऊन दाऊदखानासह अनेक सरदार जखमी होऊन नाशिकला आराम करायला पांगले.

## दिंडोरी - कडवा नदीपाशी दाऊद खानाशी चकमक - २

शिवाजी महाराजांनी या ठिकाणी दाऊदखान येऊन धुमाकूळ घालून मालवाहक जनावरांना व त्यांच्या लमाण तांडे मालकांना बंदी करून परत फिरायला लावेल म्हणून नदीपासून दूर संरक्षक गोलाकार सैन्याचे कडे एकात एक करून वाट पहात




असावेत. खुद्द शिवाजी महाराज लमाण तांडेवाल्याशी सलोख्याने काहीही झाले तरी आम्ही तुम्हाला व तुमच्या जनावरांवर हल्ला होऊ देणार नाही. तुम्ही आमच्या दगा बाजी केलीत तर आम्ही तुम्हाला मारून टाकून तेंव्हा बऱ्या बोलाने आमच्या बरोबर राहून पुढे जाणे हेच तुम्हाला करावे लागेल. काही कारणाने तुमच्या जनावरांना इजा झाली तर त्याची नुकसान भरपाई आम्ही करून देऊ. असे बोलून त्यांना चुचकारून तर धाक दाखवून एकत्र ठेवायला वारंवार बोलून समजावत होते. त्या लमाणींच्या भाषेतील मुखिये आपापसात बोलून एकाएकी सैरावैरा पळून जाऊ नका. फुकट मराल. असे बजाऊन सांगताना महाराज पहात होते.

## पालखेडपाशी ३ (हे पालखेड पहिले बाजीराव आणि निजाम यातील संघर्षाचे नव्हे)

सायंकाळची वेळ, दमलेल्या जनावरांना चरायला सोडून तांड्यातील लमाणी आराम करत असतील. तेव्हा लांबवरून धुळीच्या लोटांमुळे महाराजांचे घोडदळ सैनिक  दाऊदखानाच्या सैन्याला जवळ न येऊन देता तांड्याला




मागे ठेऊन लांब विखरून जाऊन गोलाकार फेर करून दाबुन धरून ठेवले असेल. तोवर पायदळ तुकड्यांनी तिथे पोहोचून मुगल सैन्याला विस्कळीत करून पळवून लावलेअसावे. सकाळपासून मजल दर मजल करत आलेले मुगलांचे घोडदळ विना पाणी - जेवणाच्या अभावी थकव्याने वाट मिळेल तिकडे निघून गेले. कांचनबारीतील लढाईत वाट अडवायला गेलेला दाऊदखान पडून व नंतर वार लागून जखमी झाल्याने तो औषधपाण्यासाठी नाशिकच्या ठाण्याकडे गेला.

महाराजांनी मुगलांच्या सैनिकी संचलनाची, लढाईच्या तंत्राची बारीक माहिती करून घेऊन आपले रणतंत्र बनवले असावे. प्रथम मुगलांच्या सैनिकी संचलनाची ओळख करून घेतली तर कांचनबारीतील हुलकावणी व नंतर झालेल्या चकमकीतून झालेल्या त्यांच्या जबरदस्त हानीची कारणे समजून घ्यायला सोईचे होईल.

वणी - दिंडोरी च्या वाटेवरील झालेल्या संघर्षांत मुगल सेनेच्या वाताहतीमुळे महाराज उत्साहित झाले असावेत. मुगलांच्या सैन्याला पुन्हा जोमाने लढायला तयार करायला नंतर तीन ते चार महिन्याचा कालखंड लागला असावा. त्या दरम्यानच्या वेगवान घडामोडींच्या तपशीलातून महाराजांच्या आधीच्या समरापेक्षा ह्या मोहिमा बदलत्या रणतंत्रामुळे जास्त धीट, प्रहारशील आणि मुगलांच्या संघर्षाची मानसिकता (विल टू फाईट) नष्ट करायला कारणीभूत झाल्या असाव्यात हे जाणवते. खुद्द महाराजांच्या आणि

प्रतापराव गुजर, मोरोपंत पिंगळे, आनंद राव मकाजींच्या सारख्या धडाडीच्या सेनानायकांच्या नेतृत्वाखाली घोडदळाने वेगवेगळ्या दिशांनी केलेल्या चढाया, जिंकलेले किल्ले आणि ४३० किमी अंतरावर कारंजा (लाड) या बाजारपेठेत जाऊन कदाचित सुरतपेक्षा जास्त मौल्यवान वस्तू हस्तगत करता आल्या असाव्यात. इतक्या लांब पल्ल्याची मोहीम हाती घेण्याचे धाडस उत्पन्न व्हायला काय तात्कालिक घटना घडल्या असाव्यात.

## ढेपाळलेले मुगल सैन्य आणि महाराजांना मिळवलेला ऐवज राजगडावर नेण्यासाठीची लगबग




## कळवण ते कुंजीरगड १८० किमी

वणी दिंडोरी मार्गावरील जोरदार झडपांमुळे दमलेल्या मुगल सैन्याला विश्रांती व औषधोपचारघेत तळावर अडकून पडावे लागले असेल. पिंपळगाव (बसवंत) मार्गाने नाशिकमधील मुगलांचा तळ चुकवला तर तांडा सिन्नरच्या चढावरून संगमनेरच्या जकातनाक्याआधी अकोलेच्या वाटेला प्रवरानदीच्या काठाने कोतुळपाशी आल्यावर महाराजांना वाटाड्यांच्या माहितीतून कुंजरगडाची रचना आणि तिथे असलेले भुयारवजा नैसर्गिक बोगदा आपल्या किमती सामानाला लपवून हप्त्या हप्त्याने कोकणातील घाटातून न्यायला शक्य आहे असे कळल्यावर महाराजांनी लमाणांना पैसे चुकते करून देऊन ते दूर गेल्याचे पाहून आपल्या सैनिकांना मोत्यांची पोती, जड-जवाहिरांच्या पेट्या, इतर माल डोक्यावर वाहून कुंजरगडाचा अत्यंत अवघड चढ चढून ते सामान भुयाराच्या पोकळीत लावून त्याला दोन्ही बाजूंनी बांधकाम करून सील केले असावे.



कुंजरगडाच्या नैसर्गिक रचनेचा फायदा घेत महाराज आता बरेच हलके सामान घेऊन मुरबाडच्या वाटेने कोकणात शिरले. तिथून ते नागावला पोहोचले. तिथे त्यांनी तोपर्यंत येणारी १० जहाजे पाहिली. मालधक्क्यावर सामान उतरवायला शेकडो कोळी लावले.




सन १६७०च्या आधीपासून राजगडावरून राजधानी रायगडावर हलवायची आज्ञा मिळाल्याने राजगडावरून थोडे थोडे करून एक एक विभागाचे सामान आणि त्या संबंधीची नोकरमंडळी, कुटुंबे यांना राहायची व्यवस्था करायला सुरवात झाली असावी. जून महिन्यात मोसमीपावसाच्या तडाख्याआधी आधी सगळे विभाग, रसद, बाजार, तातपुर्ती राहायची घरे याची व्यवस्था करायचे हुकुम महाराजांनी सुरतला जाताना दिले असावेत. पुढील काही वर्षांत रायगडावर थाटाच्या राज्याभिषेकासाठी सुरतेहून आणलेला किमती माल वापरायला लागणार होता. शानदार राजसिंहासन, त्याला सोन्याचे आवरण, दरबारातील गालिचे, झुळझुळीत पडदे, शामियाने यासाठी जहाजावरून आणलेले भपकेबाज कापडचोपड आणि लाकडे त्यातून

कलापूर्ण निर्मिती करणारे कुशल कारागीर यांना जहाजातून आणले गेले होते. त्यांना रायगडाच्या पायथ्याशी वसाहत करून देण्याचे हुकुम महाराजांनी दिले.




कुंजरगडावरून महाराज कोकणात परतायच्या आधी मुगलांच्या आणखी पेठांवर डल्ला मारायसाठी चर्चा केल्या गेल्या. वाटाडे आणि सरदारांशी खलबते करून जायला लागणारे अंतर आणि तिथे पोहोचायच्या वाटेवरील धोके आणि वेळ याचा सविस्तर आढावा घेऊन असे ठरले की औरंगाबाद, सिल्लोड, खामगाव, बाळापुर याठिकाणी मुगलांचे मोठे तळ आहेत.

त्या तळांवरील किल्लेदारांना कळू न देता उदगीरच्या आसपास असलेल्या आपल्या सैन्याने नांदेड, दिग्रस असे करत करत २८८ किमी जाऊन विदर्भातील कारंजे व्यापारी पेठ गाठायची.




तिथला भुईकोट किल्ला हल्ला करून लुटायला सोपा आहे. तटबंदी जुनाट आणि भगदाडांची आहे. त्या ठिकाणचा किल्लेदार नुकताच बदलून आला आहे. त्याचा वचक कमी आहे. ३शे पेक्षा कमी सैनिकांना पेठेचे रक्षण करायला जमणार नाही ते पळून जातील. हे काम सरसेनापतींच्या नेतृत्वाने व्हावे असे ठरले. शिवाजी महाराज स्वतः येत आहेत अशी बातमी आधी पासून कळायची सोय करावी लागेल. असे ठरले असावे.



सध्याचे लाडाचे कारंजा  गावाचे तट आणि बुरुज

दुसऱ्या बाजूला मुगल सरदारांना, इंग्रजांना, पोर्तुगीजांना महाराजांच्या आरमाराचा धाक वाढवलेला वाटावा म्हणून आरमाराचे सराव करायला गुजरातच्या किनाऱ्यांपाशी महाराजांनी आपली अनेक गुराब नेली गेली असावीत.




कारंजा व्यापारी पेठेत शिवाजी महाराजांच्या सैनिकांनी धुमाकुळ घातला. मुगल आणि विजापुरकरांना कळायच्या आत ३ ते ४ दिवसात जे सामान त्यांच्या हातात आले त्याचे मुल्य १ कोटी होते त्यात नक्त जवाहर, सोने रुपे उंची कापड ४००० मालजनावरांवर ५३१ किमी रस्त्याने लादून नेला गेला.

# सुरतेचे मौल्यवान सामान घेऊन जाताना

## समारोप भाग ९




**छत्रपती शिवाजी महाराजांच्या ३५०व्या शिवराज्याभिषेकोत्सवदिना निमित्ताने महाराजांना मिलिटरी कमांडरांच्या वतीने वंदना**

**भाग ९**

# समारोप

**पुरावे आणि साधनांचा विचार करून मिलिटरी कमांडरांच्या नजरेतून हा आलेख सादर केला आहे. आम्ही म्हणतो तसेच घडले असा दावा नाही. मात्र एकंदरीत मोहिमांचा आवाका आणि लष्करी चातुर्य याची ओळख वाचकांना, गड प्रेमींना, इतिहासाबद्दल आस्था असणाऱ्यांना व्हावी या उद्देशाने केलेले लेखन आहे. यात भर घालायला किंवा त्रुटी निदर्शनास आणून दिल्या तर आभारी राहीन. मात्र वाद निर्माणकरून खोड्या काढलेल्या लेखनास प्रतिसाद दिला जाणार नाही.**

## वाचकांच्या विचारासाठी सादर

१. सुरतेहून ६ ऑक्टोबर १६७० रोजी महाराज तांडा बरोबर घेऊन निघाले. त्याच दिवसात मुगलांचे बातमीदार ही बातमी दौलताबादमधे राहणाऱ्या शाहजाहा मुअज्जम याला सांगायला रोज ५० (३० मैल) ते ६० (४० मैल)किमी वेग धरला तर आणि साखळीच्या बातमीदारांकडून तातडीचा निरोप पाठवला असे मानले तर १२ किंवा १३ ऑक्टोबरला ३५० किमी अंतरावर असलेल्या दौलताबादेत हल्ला झाल्याची बातमी कळल्यावर २१३ किमीवरील बऱ्हाणपुरला असलेल्या दाऊदखान सरदाराला सैन्य जमवून तेथून २५७ किमी वरील चांदवडला जाऊन सैन्य कारवाईला निघाला असे असे मानले पाहिजे. चांदवडच्या भागात बंदोबस्तासाठी जायला पाठवलेला निरोप १५ ऑक्टोबरला मिळाला असे मानले तर तो तर मग दाऊदखान चांदवडला किल्ल्याच्या पायथ्याशी सैन्य जमवून कांचनबारीकडे जाऊन १६ ऑक्टोबरच्या रात्री एका दिवसात २५० किमी अंतर काटून गेला असा निष्कर्ष काढावा लागतो.

ऐतिहासिक घटनात दाऊदखान औरंगाबादला शाहजाद्याला भेटून (दौलताबादला) मग चांदवडला गेला असे मानतात. अंतरांचे आणि दिवसांचे गणित घातले तर त्यात काही तरी गडबड आहे असे जाणवते.

२. ऐतिहासिक कागदांवरून शिवाजीमहाराज पुन्हा समुद्रमार्गाने सूरतला निघाले असे मानतात. (संदर्भ - शककर्ते शिवराय खंड २ पान १९२-१९३. लेखक - विजयराव देशमुख) मग मुगलांची सैन्य तयारी कानावर आल्याने महाराज बागलाणात घुसले अहिवंतगड, अचलगड, मार्कंडगड, रवळा जावळागड जिंकून बऱ्हाणपुराकडे सरकले. तिथे जायच्यावाटेवर दाऊदखानाशी सामना होताहोता वाचला.

महाराजांनी मोरोपंत पिंगळे यांच्या नेतृत्वाखाली साल्हेरच्या किल्ल्याच्या आसपास लढायला ठेवले आणि ते वऱ्हाडातील कारंजाला येऊन थडकले. (नोव्हेंबर महिन्याच्या शेवटी १६७०) तेथून नंतर परतीच्यावाटेवर महाराज ४००० हजार बैलांवर प्रचंड सामान लादून बरोबर घेऊन परत बागलाणात आले. त्यांचे आणि मोरोपंत पिंगळे याच्या बरोबरचे असे एकूण २० हजार सैन्य एकत्र येऊन साल्हेर

किल्ला जिंकले. तेंव्हा (जाने १६७१)पौषमास  संपत आला होता.(Ref - Shivaji: His life and times - Chp 12: Offensive against Mughals. Page 428-429. by Gajanan B Mehendale) आणि संदर्भ: शककर्ते शिवराय खंड २ पान १९५. लेखक -  विजयराव देशमुख)

वरील अंतरांचा विचार करता...

१. सप्टेंबर १६७० मधे सूरतला जाताना घोडदळ आणि पायदळ एकत्रकरून १५ हजार सैन्य घेऊन निघाले होते. त्यांनी कुठे कुठे जाऊन साहसी मोहिमा केल्या. ते पाहू.

| कुठून कुठे | अंतर |
|---|---|
| राजगड ते सूरत | ४३६ किमी |
| सूरत ते कुंजरगड ते राजगड<br>रायगडला समुद्री मार्गाने आलेला माल | ७२८ किमी |
| रायगड ते नागाव बंदर | ९० किमी |
| नागाव/रायगड  ते साल्हेर पुन्हा सुरतवर | ५२८ किमी |
| साल्हेर (हा भाग नंतरच्या मोहिमांसाठी अंतर मोजायला सोईचा मानला तर) ते कारंजा | ४७९ किमी |
| कारंजा ते साल्हेर (४००० बैलावर लादलेले मौल्यवान सामान बरोबर घेऊन) परतीचे | ४१९ किमी |
| साल्हेर ते रायगड | ७४ किमी |

एकूण - ३१५४ किमी अंतराच्या मोहिमा सप्टेंबर ते जाने १६७१ साधारण ४ महिन्यात

१२० दिवस = मधे ना विश्रांती ना लढाईच्या घटना असे मानले तर २६ किमी दररोज. .

यानंतरही मोहिमांतून बागलाणची भूमी धगधगती होती. अनेक गड मिळत होते. जात होते. इथे फक्त सूरत आणि कारंजा येथील मौल्यवान सामानाच्या संबंधित मोहिमांची एकत्रित मांडणी केली आहे.

शिवाजी महाराजांकडे दैवी शक्ती होत्या असे मानले तरी त्यांच्या बरोबरचे १० हजार पेक्षा जास्त सैनिक मावळे, घोडे, त्यांची राखण करणारे, भोजनव्यवस्था, हजारो मालवाहक जनावरांची व त्यांचे नोकरवर्ग वगैरे विचारात घेता ते मानवी कुवतींच्या परिघात काम करणारे असावेत. इतक्या दूरच्या मोहिमांची आखणी, मुगल आणि अदिलशाहीच्या सैन्य शक्तीला टक्कर देण्यासाठी सज्जता वगैरे धोके विचारात घेतले जावेत.

# साधारण कल्पना यायला माहिती सादर

## १. मध्ययुगीन लोक एका दिवसात किती अंतर चालत होते?

| | |
|---|---|
| पायी प्रवास करणारी व्यक्ती एका दिवसात | १६ ते २० किमी - १० ते १२ मैल |
| एक व्यापारी ट्रेन किंवा कारवां चालताना | २५ ते ३५ किमी - १५ ते १८ मैल |
| एक घरगुती सामानासह किंवा सैन्य, गाड्या आणि पॅक प्राण्यांसह | १६ ते २० किमी - १० ते १२ मैल. |

## २. घोड्यांची गती

| घोड्यांची गती | किमी व मैलात |
|---|---|
| चालण्याचा वेग सरासरी | ६ ते ७ किमी ४ मैल |
| दुडकी चाल - ट्रॉट, | १२ ते २० किमी ८-१२ मैल |
| किंचित वेगवान धाव - कॅंटर | २० ते २५ किमी १२-१५ मैल |
| चौखुर भरधावेची सरासरी | ४० ते ५५ किमी २५-३५ मैल |
| रेसकोर्सवरील घोड्यांची गती | ६५ ते ९० किमी ४०-५५ मैल |

३. मालवाहक प्राण्यांच्या भार क्षमता व कामाच्या दराचा अंदाज

| प्राणी | भारक्षमता | दैनिक काम दर |
|---|---|---|
| हत्ती | ५०० किलो | ५-८ तास/चालणे २४ किमी |
| बैल | १५०-२५० किलो | ८-१० तास ५० किमी |
| गाढव/ खेचर | ५० किलो | ८ तास सपाट ५० पर्वत ३० किमी |
| घोडा | ६० किलो | ६ तास सपाट ५० पर्वत ४० किमी |

## सुरतेच्या दुसऱ्या मोहिमेचे फलित -

शिवाजी महाराजांनी जंगल आणि सह्याद्रीच्या गिरी किल्ल्यापासून दूर जाऊन बागलाण, विदर्भ भागातील मोहिमेतून अनेक गोष्टी साध्य केल्या. भरपूर प्रमाणात मौल्यवान वस्तू, धन-संपत्ती मिळवली. मोकळ्या मैदानातील भौगोलिक महत्व समजून घेऊन कल्पकतेने मोहिमा रचल्या. सैन्यबळ जास्त असलेल्या शत्रूदलाला वेगवेगळ्या युक्त्या वापरून धक्का तंत्र, गोंधळाची परिस्थिती निर्माण करणे, वेळ पडली तर माघार घेऊन बेसावध शत्रूला पुन्हा गाठणे, चपळ हालचाली, भोजनाची मोजकी व्यवस्था, बोजड मालामुळे संथचालीच्या शत्रूला रात्र किंवा पहाटे पहाटे गोलाकार घोडदळाची रचना करून हल्ला करणे, धावाधाव करायला लावणे वगैरे रणनितीचा धूर्तपणे वापर केला.

**छत्रपती शिवाजी महाराजांच्या ३५०व्या शिवराज्याभिषेकोत्सवदिना निमित्ताने महाराजांना मिलिटरी कमांडरांच्या वतीने वंदना**

# समाप्त